बी.डी.डी. चाळीच्या पुनर्विकास प्रकल्पातील गाळेधारकांच्या पात्रतेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**गृहनिर्माण विभाग,**

**शासन पुरकपत्र क्रमांक :- विविचा-२०२१/प्र.क्र.२१०/गृनिप**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १४ ऑक्टोबर, २०२१.

वाचा :- १) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्रमांक : विविचा-२०१६/ प्र.क्र.२६१ /गृनिप, दि.२४.०४.२०१८
२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्रमांक: विविचा- २०१६/ प्र.क्र.२६१/ गृनिप, दि.०९.०३.२०२१
३) मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ यांचे पत्र क्र. जा.क्र.का.अ./बी.डी.डी./ मुं.मं. /ईटी-४९५ /२०२१, दि.०६.०८.२०२१

**शासन पुरकपत्र :-**

उपरोक्त वाचा क्र.२ येथील दि.०९.०३.२०२१ च्या शासन निर्णयान्वये बी.डी.डी. चाळीतील भाडेकरुंच्या गाळ्यांच्या हस्तांतरणाबाबतची मुदत दि.०१.०१.२०२१ पर्यंत वाढविण्यात आलेली आहे. त्यामुळे दि.०१.०१.२०२१ रोजी बी.डी.डी. चाळीतील निवासी / अनिवासी गाळ्यात वास्तव्यास असणाऱ्या ज्या भाडेकरुंवर अनधिकृत भाडेदारी हस्तांतरणाबाबत दि.२४.०४.२०१८ च्या शासन निर्णयानुसार दंडात्मक शुल्क आकारण्यात आलेले आहे, असे निवासी गाळ्यातील भाडेकरु जर दंडात्मक शुल्क भरल्याची पावती सादर करु शकले नाहीत, मात्र ते पात्रतेच्या अन्य अटी पूर्ण करीत असतील तर, अशा निवासी गाळ्यातील भाडेकरुंना तात्पुरत्या स्वरुपात संक्रमण शिबीरातील गाळ्यांसाठी पात्र ठरविण्यात यावे. मात्र, अशा मूळ गाळ्याच्या बदल्यात पुनर्विकसित गाळ्यांबाबत त्यांच्याशी प्रत्यक्षात करारनामा करतांना त्यांनी भाडेदारीच्या अनधिकृत हस्तांतरणाबाबत त्यांच्यावर आकारण्यात आलेल्या दंडात्मक रकमेचा भरणा केल्याची पावती / दंडात्मक रक्कम संचालक, बी.डी.डी. कार्यालयाकडे सादर करणे /भरणा करणे अनिवार्य राहिल. सदरची अट त्यांच्यासोबत संक्रमण शिबीरातील गाळ्याबाबत करावयाच्या करारनाम्यामध्ये स्पष्टपणे अंतर्भूत करण्यात यावी.

२. त्याचप्रमाणे अनिवासी गाळे धारकांच्या अनधिकृत हस्तांतरणाबाबत त्यांच्यावर जर दंडात्मक शुल्काची आकारणी करण्यात आलेली असेल तर, अशा भाडेकरुंसोबत पुनर्विकसित गाळ्याचा करारनामा करण्यापूर्वी त्यांनी सदरची दंडात्मक शुल्काची रक्कम भरल्याबाबतची पावती सादर करणे किंवा दंडात्मक रकमेचा भरणा संचालक, बी.डी.डी. कार्यालयाकडे करणे अनिवार्य राहिल.

३. सदर शासन पुरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०२११०१४१२४०२८५९०९ असा आहे. हे शासन पुरकपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Tulshiram Shete

Digitally signed by Arvind Tulshiram Shete
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=d33ed79e4d2d2921d0ca79b9de78fffaa75e5ff9801ced3d15f5ca38bf6aab62, serialNumber=822dcc756ffe36bfe50f258eb6574ffef985ea24e97243442a9c1b3323aaca40, cn=Arvind Tulshiram Shete
Date: 2021.10.14 12:42:21 +05'30'

**( अरविंद शेटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. सभापती / मा. उपसभापती विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
३) मा. अध्यक्ष / मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
४) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
७) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
८) मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) मा. मंत्री (पर्यटन, पर्यावरण व राजशिष्टाचार), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११) मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२) मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व), मंत्रालय, मुंबई
१३) मा. संसद सदस्य / मा. विधान परिषद सदस्य / मा. विधानसभा सदस्य (सर्व)
१४) मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
१५) अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय, मुंबई.
१६) प्रधान सचिव (गृहनिर्माण), मंत्रालय, मुंबई.
१७) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका
१९) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, (म्हाडा), गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई.
२०) मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई.
२१) उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
२२) निवडनस्ती (गृनिप).